**सार्वजनिक बांधकाम विभागातील कंत्राटदारांचे अंदाजपत्रके, कार्यारंभ आदेश, कामांची मोजमाप पुस्तक, देयके, स्काडा आणि अवलोकन ज्ञापन संगणकीकृत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीओएम-२०१९/१९३/प्र.क्र.२५/ संगणक कक्ष**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१ ऑक्टोबर, २०१९

प्रस्तावना-

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येणाऱ्या कामकाजामध्ये पारदर्शकता आणण्याच्या दृष्टीने सद्या अस्तित्वात असलेल्या संगणक प्रणालीमध्ये (Software) सुधारणा करण्याचे प्रयास सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येत आहेत. सर्वसाधारणपणे सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत करण्यात येत असलेल्या विविध प्रकारच्या कामांसाठी पुढील प्रमाणे कार्यपध्दती अवलंबली जाते. त्यानुसार कोणत्याही कामासाठी निविदा प्रक्रियेद्वारे निवड झालेल्या कंत्राटदार अथवा सुशिक्षित बेरोजगार अभियंता यांना निविदा स्विकृती नंतर कार्यारंभ आदेश दिला जातो. तद्नंतर कंत्राटदार अथवा सुशिक्षित बेरोजगार अभियंता प्रत्यक्ष कामाला सुरूवात करतो. सदर कामावर देखरेख ही सा.बां.उपविभागातील कनिष्ठ अभियंता मार्फत केल्या जाते. कनिष्ठ अभियंता त्यांच्या कडील कामांचे मोजमाप पुस्तकामध्ये कामाचे प्रकारानुसार (B१,B२, C, D इ.) कामाचे विविध टप्पे, दिनांकनिहाय मोजमापांची नोंदी घेतात. त्यानुषंगाने कामाचे देयक मंजुरीस्तव संबंधित उपअभियंता, विभागीय कार्यालयातील तांत्रिक व लेखा शाखेच्या मंजुरीनंतर कार्यकारी अभियंता यांचेकडे सादर करण्यात येते. सदरहू देयक मंजुर झाल्यानंतर कंत्राटदारास देयकाचा निधी प्रदान करण्यात येतो.

तसेच सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत दक्षता व गुण नियंत्रण मंडळातर्फे कामांची गुणवत्ता तपासण्यात येते. त्यानुषंगाने कामावर अवलोकन ज्ञापन नोंदविण्यात येते. अवलोकन ज्ञापन अंतर्गत नोंदविण्यात आलेले मुद्दे संबधित विभागीय कार्यालयास कळविण्यात येतात. सदरहू मुद्यांचा समाधानकारक अनुपालन प्राप्त होईपर्यंत अवलोकन ज्ञापन वरील कार्यवाही सुरू असते. त्यानुसार कामाचे देयके अदा करताना उपरोक्त बाबींची तपासणी करण्यात येते.

सदर प्रक्रिया अधिक पारदर्शक, सुलभ, कालबध्द तसेच प्रभावी करण्याचा मतप्रवाह बऱ्याच कालावधीपासून सुरू होता. तद्नुषंगाने प्रचलित पध्दतीतील कालापव्यय व इतर क्लिष्टता टाळण्याच्या व विभागात सुसुत्रता आणण्याच्या दृष्टीने कामाचे अंदाजपत्रके, कंत्राटदारांचे कार्यारंभ आदेश, कामांची मोजमाप पुस्तक, देयके, स्काडा आणि अवलोकन ज्ञापन संगणकीकृत करून ऑनलाईन प्रणालीत जतन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

e-bill प्रणाली लागू करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाने मोजमापे व देयकासंदर्भातील संबंधित अन्य शासन निर्णय व परिपत्रके या निर्णयानुसार अधिक्रमित करण्यात येत आहेत.

१) सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात येणारी अर्थसंकल्पीय तसेच ठेव अंशदान निधी आणि अन्य स्रोत्राद्वारे मंजूर झालेली कामे कार्यान्वित करताना शासकीय कामकाजात पारदर्शकता व गतिमानता आणण्यासाठी तसेच एकच माहिती भरण्याची पुनरावृत्ती टाळण्यासाठी (Repetition of data entry in different formats ) ई-बील प्रणालीद्वारे कामांचे संगणकीकृत संनियंत्रण (Digital Monitoring of Works) करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२) सदर ई-बील प्रणाली टप्प्या-टप्प्याने २०१९-२० या वर्षात कार्यान्वित करण्यात येईल.

३) सार्वजनिक बांधकाम विभागात अस्तित्वात असलेल्या तसेच ई-बील प्रणालीचे विविध टप्पे पुढीलप्रमाणे आहेत :-

(i) Online estimate प्रणाली वापरुन Stage I estimate हे संबंधित कामाबद्दलचे सर्व दस्तावेजसह अपलोड करून तयार करणे.

(ii) प्राधिकृत अधिकारी मार्फत Stage I मंजूर करणे . (प्रशासकीय मान्यता देणेä)

(iii) तद्नंतर Online estimate प्रणाली अंतर्गत प्रशासकिय मान्यता पत्र Unique ID सह तयार करणेä.

(iv) Online estimate प्रणाली वापरुन Detail estimate हे संबंधित कामाबद्दलचे सर्व नकाशे आणि अन्य दस्तावेजसह अपलोड करून तयार करणे.

(v) सक्षम अधिकारी मार्फत Detail estimate मंजूर करणे . (तांत्रिकò मान्यता देणे )

(vi) तद्नंतर Online estimate प्रणाली अंतर्गत तांत्रिक मान्यता पत्र Unique ID सह तयार करणेä.

(vii) Online estimate प्रणालीत तयार झालेले Detail estimate अंतर्गतचे BOQ हे web service द्वारे e-bill करिता उपलब्ध करणे.

(viii) Online DTP प्रणाली वापरुन संबंधित कामाचे DTP तयार व मंजुर करणे.

(ix) कामाची निविदा स्विकृती झाल्यानंतर निवड झालेल्या कंत्राटदाराकडून Security Deposit भरण्याचे पत्र ऑनलाईन निर्गमित करणे .

(x) कंत्राटदाराने ऑनलाईन Security Deposit भरल्यानंतर Unique ID कृत Automise पद्धतीने Human Interface टाळुन कार्यारंभ आदेश तयार करणे व ऑनलाईन ई-मेलद्वारे PAN No. , Bar Code इ. बाबी अंकीत करून निर्गमित करणे.

(xi) e-bill प्रणालीत कामाचे मोजमाप कंत्राटदाराच्या लॉगीन द्वारे सुरू करणे. तद्नंतर देयक कनिष्ठ अभियंता, उपअभियंता, विभागीय कार्यालयातील कनिष्ठ अभियंता, उप कार्यकारी अभियंता, ऑडीटर, लेखाधिकारी व कार्यकारी अभियंताकडे मंजुरीकरीता सादर करणे. (प्रत्येकास वेगवेगळे लॉगीन्स राहतील. प्रत्येक अधिकारी व कार्यासन यांच्याकडुन विहित कालावधीत कार्यवाही (action) न झाल्यास त्यांच्या जवाबदारीवर देयके पुढील पातळीवर push होतील व संबंधिताना संगणकीकृत ई-मेलद्वारे dereliction of duty बाबत कळविण्यात यावे व सक्षम अधिकाऱ्यास पुढील कार्यवाहीसाठी अवगत करण्यात यावी.)

(xii) e-bill प्रणालीद्वारे मंजूर देयकाचा तपशिल आणि प्रत्येक देयकांची सद्य:स्थिती संबंधित कंत्राटदारास ईमेल द्वारे कळविणे. (e-bill प्रणाली अंतर्गत देयके तयार करताना कंत्राटदार / सा.बां. विभागाद्वारे कामनिहाय Royalty Passes व Bitumen Challan upload करण्याची सुविधा e-bill प्रणालीत अंतर्भुत केली आहे.)

(xiii) प्रकल्पाचे प्रगतीपथावरील छायाचित्र upload करणे. प्रकल्पांतर्गत Secured Advance बाबत शासन निर्णयाप्रमाणे Latitude, Longitude सह छायाचित्र upload करणे.

( xiv) प्रादेशिक व जिल्हा स्तरीय प्रयोग शाळा येथे द.व.गु.नि. मंडळ , नागपुर मार्फत Online Material Testing प्रणाली अंतर्गत कामाचे Online Material Testing चा Data, Test reports , frequency charts इ. e-bill प्रणालीत Web service व्दारे अन्य सर्व अधक्षिक अभियंत्यांना उपलब्ध करणे.

( xv) e-bill अंतर्गत मोजमापे मंजूर करतांना द.व.गु.नि. मंडळ , नागपुर मार्फत तयार केलेली ऑनलाईन ज्ञापन प्रणालीमुळे सर्व कामाचे कार्यारंभ आदेश, Test reports इत्यादी तपशिल वापरून उपलब्ध कामाची देयके मंजूर करतांना कामाची गुणवत्ता तपासूनच बिल मंजूर करणे.

(xvi) कामाची देयके मंजूर करतांना ज्या कामाकरीता SCADA प्रणाली वापरली जाणार आहे त्या कामाचा SCADA Data ( हा e-bill प्रणालीत Web service व्दारे उपलब्ध असेल ) वापरून कामाची गुणवत्ता तपासून ई-बिल मंजूर करावे.

(xvii) मंजुर देयक Accounts Management System प्रणालीत उपलब्ध करणे. ( e-bill प्रणाली अंतर्गत तयार झालेले देयके Accounts Management System प्रणालीत उपलब्ध असेल. तसेच ICICI Bank मार्फत तयार केलेल्या प्रणाली मार्फत कंत्राटदारास थेट भूगतान करणे,लेखा तयार करताना देयकांची यादीतुन मंजुर देयक Voucher तयार करताना उपलब्ध असेल जेणेकरून वारंवार कामाची माहीती भरण्याची आवश्यकता भासणार नाही. )

(xviii) Direct payment to contractor : e-bill मार्फत तयार झालेल्या देयकाचे भूगतान कंत्राटदाराच्या खात्यात थेट जमा करणे (ICICI Bank व्दारे या प्रणालीचे विकसन करण्याचे काम प्रगतीपथावर आहे. तसेच सदर प्रणालीचे BDS / BEAMS प्रणालीसोबत Webservice व्दारे जोडण्याचे काम प्रस्तावित आहे. )

(xix) PWD Dashboard : e-bill प्रणाली अंतर्गत देयकाची सद्यस्थिती , मंजुर देयके, प्रलंबित देयके तसेच एकुण कामाच्या प्रगतीचा गोषवारा हा e-bill प्रणालीसोबत Integrate करून PWD Dashboard प्रणालीत उपलब्ध करणे ( त्यामध्ये estimate, bills, due prepayment, bills due for payment, Divisionwise expenditure इत्यादीचा समावेश करण्यात यावा.)

४) उपरोक्त सर्व ऑनलाईन संगणक प्रणाली ही सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकेत स्थळावर (www.mahapwd.com) कार्यालयीन कामकाजाकरीता उपलब्ध आहेत. वर नमूद केलेल्या ऑनलाईन संगणकीय प्रणालीमध्ये क्षेत्रीय अधिकाऱ्यांच्या अडचणी विचारात घेऊन वेळोवेळी सुधारणा प्रस्तावित करण्यात याव्यात.

५) सदरहू e-bill प्रणाली संगणकीय कार्यप्रणाली मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांच्या अधिपत्याखाली नागपूर येथील माहिती व तंत्रज्ञान समन्वय केंद्र (आयटीसीसी) मध्ये C-DAC Pune यांच्या सहाय्याने विकसित करण्यात आली असून मा. सचिव (रस्ते) हे प्रमुख समन्वयक व मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, नागपूर हे सह-समन्वयक राहतील. तसेच सदर प्रणालीअंतर्गतची माहिती आणि अहवाल हा सा.बां.विभागाच्या इतर प्रणालीत Web Service च्या माध्यमातून समन्वय साधून

कार्यान्वीत (Integration) करण्यात येईल. Administrative Right चे Login ITCC नागपूर कडे असतील. सा.बां.विभागातील अधिकारी व कर्मचा-यांची बदली, पदोन्नती नंतर संबंधित विभागात त्यांची माहीती e-bill प्रणालीत ITCC, नागपूर यांनी अद्ययावत करण्यात यावी.

६) सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून कार्यारंभ आदेश हे ऑनलाईन स्वरुपात राहतील आणि सर्व देयके ऑनलाईन स्वरुपात सादर आणि मंजूर केल्या जातील. E-measurement ऑनलाईन कार्यप्रणालीद्वारे मोजमाप पुस्तक तयार होत असल्यामुळे प्रचलीत पद्धतीतील मोजमाप पुस्तके कालबाह्य होतील. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभागात मोजमाप पुस्तकात मोजमापे नोंदविणे २ एप्रिल, २०२० पासून बंद करण्यात येईल.

७) e-bill ऑनलाईन संगणक प्रणालीचे अंतर्गत संगणक प्रणालीचे देखभाल, हार्डवेअर/सर्व्हर, विविध टप्पे विकसित करणे, वार्षिक देखभाल इ. खर्च मागणी क्र.६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, (०२) (०२) सार्वजनिक बांधकाम, विभागातील कार्यालयाचे संगणकीकरण (कार्यक्रम), १७ संगणक खर्च, (२०५९ २९४९), दत्तमत्त या लेखाशिर्षाद्वारे करण्यात यावा.

८) e-bill ऑनलाईन संगणक प्रणालीमध्ये कुठलेही वादविवाद अथवा तंटा, भांडणे, दावे उद्‌भवल्यास संबंधित जिल्हा सत्र न्यायालय आणि मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या अधिकार क्षेत्रात हाताळण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०३११५०६४८०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar Prabhakar Joshi

Digitally signed by Chandrashekhar Prabhakar Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c8893d1513ab2ea4a7f8c612a31ac748bd05ab00efd5e22f2d25c9872e36d29, serialNumber=423be4ff70a89bfc945ec5e481b972d568094459d7ff8219a1f968860a431f89, cn=Chandrashekhar Prabhakar Joshi
Date: 2019.10.31 15:09:28 +05'30'

**( चंद्रशेखर जोशी )**
**सचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
२. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, यांचे खाजगी सचिव,
३. अ.मु.स., सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, महाराष्ट्र

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर, महाराष्ट्र
६. सर्व मुख्य अभियंता, सा. बां. प्रादेशिक विभाग,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई.
८. सर्व अधीक्षक अभियंता, सा. बां. बांधकाम मंडळ.
९. सर्व कार्यकारी अभियंता, सा. बां. विभाग.
१०. सर्व मंत्रालयीन विभाग.
११. स्वीय सहाय्यक, सचिव (बांधकामे) सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. स्वीय सहाय्यक, सचिव (रस्ते) सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी, अर्थ-१, इमारती - २, सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती, संगणक कक्ष.